**शिक्षण आयुक्तालय व अधिनस्थ संचालक कार्यालये यांच्यासाठी संगणक व प्रिंटर कम स्कॅनर खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देणे.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईगव्ह-१५२०/प्र.क्र.३/संगणक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २१ जानेवारी, २०२०.

**वाचा :-**

१) शिक्षण आयुक्तालय, पुणे यांचे जा.क्र.शिआ/२०१८/नवीन संगणक खरेदी प्रस्ताव/आस्था क्र.१४३/६९४१, दि.७ डिसेंबर, २०१९.
२) प्रकल्प अंमलबजावणी समिती बैठकीचे इतिवृत्त दि.२६.१२.२०१९.

**प्रस्तावना :-**

शिक्षण आयुक्तालय व अधिनस्थ संचालक कार्यालये यांच्यासाठी ई-गव्हर्नन्स अंतर्गत नवीन संगणक, प्रिंटर खरेदी करण्याचा प्रस्ताव दि.२६ डिसेंबर, २०१९ रोजी प्रकल्प अंमलबजावणी समितीने मंजूर केला आहे. त्यानुषंगाने नवीन संगणक सामुग्री खरेदीच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

२. प्रकल्प अंमलबजावणी समितीने दिनांक २६ डिसेंबर, २०१९ रोजीच्या बैठकीत केलेल्या शिफारशीनुसार शालेय शिक्षण विभागातील शिक्षण आयुक्तालय व अधिनस्थ संचालक कार्यालये यांच्यासाठी ९५० संगणक, २२१ प्रिंटर कम स्कॅनर खरेदी करण्याच्या रु. ४८०.०४ लक्ष (GST सह) खर्चाच्या प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे. खरेदी करावयाच्या संगणक सामग्रीचा तपशील खालील तक्त्यात नमूद आहे.

| अ. क्र. | वस्तुचे विवरण | अंदाजे किंमत | संख्या | एकूण |
|---|---|---|---|---|
| १. | Desktop Computer (High End) | ४५,००० | ५० | २२,५०,००० |
| २. | Desktop Computer | ४०,००० | ९०० | ३,६०,००,००० |
| ३. | Printer Scanner | ११,००० | २२१ | २४,३१,००० |
| ४. | GST @ १८% | | | ७३,२२,५८० |
| ५. | Total | | | ४,८०,०३,५८० |

३. सदरचा खर्च मागणी क्रमांक. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण,८० पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ( २२०२ H ४५४ ) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षातून सन २०१९-२० च्या उपलब्ध तरतुदीमधुन भागविण्यात यावा. यासाठी विभागातील सहसचिव (लेखाशाखा), यांना नियंत्रक अधिकारी व अवर सचिव (लेखाशाखा) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-२०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग- २ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१२१११७३८८३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=ad4976f306de2810214ec2ea330d9daea59f1d3f45fae9227a3feaa541af10d1,
serialNumber=dc78036626ec580d66c0ac502d43af5f670b5ba13f51213ad071acd53714a284, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2020.01.21 11:19:09 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) अ.मु.स., वित्त विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२) अ.मु.स., शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्विय सहायक मंत्रालय, मुंबई.
३) प्र.स., माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.,
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
८) निवडनस्ती,संगणक कार्यासन.